सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखालील मंत्रालय आहार/उपाहारगृहांच्या आस्थापनेवरील चतुर्थश्रेणी कर्मचा-यांना गणवेष देण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग(उपाहारगृहे)**
**शासन निर्णय क्रमांकःसंकीर्ण-२०११/पोशाख/प्र.क्र.५५/११/मंउका,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दि.०८ डिसेंबर,२०११**

**वाचाः-**

१)सामान्य प्रशासन विभाग(सचिवालय कॅन्टीन्स) शासन निर्णय क्रं.सीएनटी/एसएमसी/युनिफॉर्मस/१९७६, दि.१८.०६.१९७६

२)सामान्य प्रशासन विभाग(सचिवालय कॅन्टीन्स) शासन निर्णय क्रं.सीएनटी/एमसी/युनिफॉर्मस/१९७७, दि.२५.१०.१९७७

३)सामान्य प्रशासन विभाग(सचिवालय कॅन्टीन्स)शासन निर्णय क्रं.एमआयएस/१०८४/युनिफॉर्मस/व्हीबीसी/एमसीएस, दि.२५.०५.१९८४

४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रं.गणवेष-१०९१/प्र.क्र.२१/९१/मंउका, दि.०२.०९.१९९१

५) सामान्य प्रशासन विभाग(उपाहारगृहे) शासन निर्णय क्रं.आस्था-गणवेष-१०९२/२४६८/मंउका, दि.१०.११.१९९३

६) सामान्य प्रशासन विभाग(उपाहारगृहे) शासन निर्णय क्रं.आस्था-गणवेष-१००९/२९५८/मंउका, दि.२३.०९.२००९

**शासन निर्णयः-**

राज्य शासनामार्फत सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखाली कल्याणकारी योजना म्हणून चौरस आहारगृह, मंत्रालय उपाहारगृह, कोकण भवन उपाहारगृह व विधान भवन उपाहारगृह ही आहार/उपाहारगृहे चालविण्यात येतात. सदर आहार/उपाहारगृहांच्या आस्थापनेवर कार्यरत असलेल्या चतुर्थश्रेणी कर्मचा-यांना संदर्भाधिन शासन आदेशातील तरतुदीनुसार वार्षीक/व्दीवार्षीक पध्दतीने गणवेषांचे वाटप करण्यात येते. सदर आदेशांमधील तरतुदीनुसार वाटप करण्यात येणा-या गणवेषामध्ये व गणवेषाच्या संचाच्या संख्येमध्ये वेळोवेळी बदल करण्यात आले आहेत. परिणामी वरीलप्रमाणे सर्व आदेश विचारात घेऊन त्यानुसार कर्मचा-यांना गणवेषाचे वाटप करताना एखादा आदेश दुर्लक्षित होण्याची शक्यता असते. त्यामुळे वरीलप्रमाणे सर्व आदेशांचे एकत्रिकरण करुन सर्व समावेशक एकच आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याचप्रमाणे मंत्रालय आहार/उपाहारगृहांच्या सेवेमध्ये सुधारणा करण्याबाबत विविध उपाययोजना करण्यात येत आहेत. सदर सुधारणेचा भाग म्हणून उपाहारगृह कर्मचा-यांची स्वच्छता व पोशाख अत्यंत महत्वाचा आहे. तसेच उपाहारगृहातील कर्मचा-यांना करावे लागणारे धावपळीचे काम, कामाच्या ठिकाणी असलेले वातावरण, उपाहारगृह कर्मचा-यांचे कामाचे तास व कामाचे एकंदरीत स्वरुप लक्षात घेता उपाहारगृहातील कर्मचा-यांचे पोशाख अतिशय लवकर व जास्त प्रमाणामध्ये खराब होतात, हि बाब विचारात घेऊन संदर्भाधिन आदेशान्वये वाटप करण्यात येणा-या गणवेषाच्या संचाच्या संख्येमध्ये वाढ करण्याची बाब सुध्दा शासनाच्या विचाराधीन होती.

२. उपरोक्त वस्तुस्थिती विचारात घेऊन शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की, संदर्भाधिन आदेश अधिक्रमित करुन सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षापासून ज्यावेळी गणवेष बदलावयाचे असतील त्यावेळी गणवेषास पात्र असलेल्या मंत्रालय उपाहारगृह, चौरस आहारगृह, विधान भवन उपाहारगृह व कोकण भवन उपाहारगृह या आहार/उपाहारगृहांच्या आस्थापनेवरील चतुर्थ श्रेणी कर्मचा-यांना या शासन निर्णया सोबतच्या परिशिष्ट-अ नुसार गणवेषांचे वाटप करण्यात यावे.

(कृ.मा.प.)

३.  त्याचप्रमाणे मंत्रालय आहार/उपाहारगृहांच्या आस्थापनेवरील ट्रे सर्व्हिसवर काम करणा-या चतुर्थ श्रेणी कर्मचा-यांना परिशिष्ट-अ मध्ये क्रं. ७ येथे त्यांच्या पदनामासमोर नमुद केल्यानुसार 'मेड टू ऑर्डर' तत्वावर विहित पध्दतीने निविदा मागवून गणवेष शिवुन घेण्यास मंजूरी देण्यात येत आहे. तसेच परिशिष्ट-अ मधील अ.क्र.४ व ७ येथे त्यांच्या पदनामासमोर नमुद केल्यानुसार स्पोर्ट शुज व पोयमोजे विहित पध्दतीने निविदा/दरपत्रके मागवून किंवा सहकारी संस्थेकडून खरेदी करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

४.  वरीलप्रमाणे गणवेषासाठी लागणारे कापड उद्योग संचालनालयाने शासकीय कार्यालयांना लागणा-या वेगवेगळया यंत्रमाग कापड (हातमाग कापडाशिवाय) दरनिश्चिती संदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार व सदर आदेशातील तरतूदीनुसार खरेदी करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. त्याचप्रमाणे गणवेष शिलाईचे दर व महिला चतुर्थश्रेणी कर्मचा-यांच्या ब्लाऊजच्या शिलाईचे दर सामान्य प्रशासन विभागाकडून गणवेषाच्या शिलाईच्या दरांबाबत वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशातील दराने राहतील.

५.  वरीलप्रमाणे गणवेषासाठी होणारा खर्च हा त्या-त्या आहार/उपाहारगृहांच्या लेखा शिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्या-त्या उपाहारगृहांच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६.  हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१११२०८१११३५७००१ असा आहे.

७.  हा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रं.८४०/११/व्यय-४, दि.०२.१२.२०११ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(श्री.प्र.पाटील)
सह सचिव, महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग (उपाहारगृहे)

प्रति,

१. महालेखाकार-१, (लेखा वअनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३. अप्पर कोषागार अधिकारी, कोकण भवन, नवी मुंबई
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई
५. कोषागार अधिकारी, ठाणे
६. उद्योग उर्जा व कामागार विभाग, कार्या-६
७. वित्त विभाग/व्यय-४
८. महाव्यवस्थापक, मंत्रालय उपाहारगृहे
९. सहा.लेखा परिक्षा अधिकारी, मंत्रालय उपाहारगृहे कार्यालय
१०. सहा.लेखा अधिकारी, मंत्रालय उपाहारगृह, चौरस आहारगृह, विधान भवन उपाहारगृह व कोकण भवन उपाहारगृह
११. व्यवस्थापक, मंत्रालय उपाहारगृह, चौरस आहारगृह, विधान भवन उपाहारगृह व कोकण भवन उपाहारगृह
१२. वरिष्ठ भांडारपाल, मंत्रालय उपाहारगृहे
१३. देयक लेखापाल, मंत्रालय उपाहारगृह, चौरस आहारगृह, विधान भवन उपाहारगृह व कोकण भवन उपाहारगृह
१४. निवड नस्ती

सा.प्र.वि.शासन निर्णय क्रमांक:संकीर्ण-२०११/पोशाख/प्र.क्र.५५/११/मंउका, दि.०८.१२.११ सोबतचे

परिशिष्ट-अ

**मंत्रालय उपाहारगृह, चौरस आहारगृह, विधान भवन उपाहारगृह व कोकण भवन उपाहारगृह**

| अ.क्र. | पदनाम | गणवेषाचा प्रकार व प्रमाण | कालावधी |
|---|---|---|---|
| १ | मुख्य आचारी | ८ धोतर किंवा ६ पॅन्ट (टेरिकॉट) | दोन वर्षातून एकदा |
| | | १० बनियान किंवा ५ बुश शर्ट (टेरिकॉट) | |
| | | ४ टॉवेल्स (सुती) | |
| २ | आचारी/चहातज्ञ | ——"—— | दोन वर्षातून एकदा |
| ३ | सहा.आचारी/चहा बनविणार | ——"—— | दोन वर्षातून एकदा |
| ४ | पर्यवेक्षक | ४ पॅन्ट (टेरिकॉट) | दोन वर्षातून एकदा |
| | | ४ बुश शर्ट (टेरिकॉट) | |
| | | १ जोडी स्पोर्ट शूज | |
| | | २ जोडी पायमोजे | |
| ५ | वाढपी/वेटर/बॉयवेटर/हमाल/सफाईगार | ४ पॅन्ट (टेरिकॉट) | दोन वर्षातून एकदा |
| | | ४ बुश शर्ट (टेरिकॉट) | |
| ६ | महिला चतुर्थश्रेणी कर्मचारी | ५ साडी (६ किंवा ९ वारी) | दोन वर्षातून एकदा |
| | | ५ ब्लाऊज (१ मीटर) | |
| ७ | ट्रे सर्व्हिस वेटर (व्हि.आय.पी.सेवा) | ६ जोधपूरी कोट (टेरिकॉट) | दोन वर्षातून एकदा |
| | | ६ पॅन्ट (टेरिकॉट) | |
| | | १ जोडी स्पोर्ट शूज | |
| | | २ जोडी पायमोजे | |

**प्रत्येक संचासाठी कापडाचे प्रमाण:-**

**१) पॅन्ट:- १.३० मीटर** **२) बुश शर्ट:- २ मीटर**
**३) जोधपूरी कोट व पॅन्ट:- मेड टू ऑर्डर ४) साडी:- ६ किंवा ९ वारी**
**५) ब्लाऊज:- १ मीटर**